**निलंबन कालावधी नियमित करणेबाबत व सक्तीचा प्रतीक्षा कालावधी आणि पदग्रहण अवधीबाबत.**

श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-२०१३/प्र.क्र.८९/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, नवीन मंत्रालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख: २० जुलै, २०२०

वाचा :-

१) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२११३/प्र.क्र.८९/पापु-१५, दिनांक २१ जून, २०१३
२) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** न्यायाप्र-२०१३/प्र.क्र.२५८/पापु-१५, दिनांक २८ मार्च, २०१४
३) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-१०११/प्र.क्र.८९/पापु-१५, दिनांक १२ मार्च, २०१५.
४) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१३/प्र.क्र.८९/पापु-१५, दिनांक ०६ जानेवारी, २०१८.

**शासन आदेश :-**

ज्याअर्थी, श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा हे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सांगली या पदावर कार्यरत असताना त्यांनी सांगली जिल्ह्यातील भूजल पुनर्भरण योजनांच्या कार्यक्रमांची अंमलबजावणी न करणे, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम समाधानकारकरीत्या न राबविणे या व इतर अनियमिततेच्या अनुषंगाने कर्तव्यात कसूर केली म्हणून त्यांना संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २१/०६/२०१३ च्या शासन आदेशान्वये शासन सेवेतून निलंबित करण्यात आले होते. तद्नंतर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन आदेश दिनांक २८/०३/२०१४ अन्वये श्री. टोणपे यांना शासन सेवेत पुनर्स्थापित करण्यात आले होते.

ज्याअर्थी, प्रस्तुत प्रकरणात श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या विरूध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ खाली संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक १२/०३/२०१५ च्या शासन ज्ञापनान्वये विभागीय चौकशी आदेशित करण्यात आली होती.

ज्याअर्थी, श्री. बी.आर.टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या विरूध्दच्या दोषारोपांची व त्यांनी सादर केलेल्या अभिवेदनाची तपासणी केली असता, तसेच चौकशी अधिकारी यांनी दिनांक २९/०७/२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या चौकशी अहवालातील निष्कर्ष विचारात घेता, असे निदर्शनास आले आहे की, श्री. बी.आर.टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांच्यावरील तीनही दोषारोप सिध्द होत आहेत. त्यामुळे संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक ०६/०१/२०१८ आदेशान्वये श्री. टोणपे यांच्या विभागीय चौकशी प्रकरणी शिस्तभंगविषयक प्राधिकारी यांच्या मान्यतेने त्यांची पुढील वेतनवाढ त्यापुढील वेतनवाढीवर परिणाम न करता दोन वर्षांसाठी रोखण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

ज्याअर्थी, श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांचे निलंबन संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक २८/०३/२०१४ च्या आदेशान्वये रद्द करून त्यांना शासन सेवेत पुनर्स्थापित करण्यात आले होते. तथापि, विभागीय चौकशीअंती श्री.टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक हे दोषी आढळून आले असल्याने व त्यांना शिक्षा बजावण्यात आली असल्याने श्री. टोणपे यांचे निलंबन समर्थनीय होते असा निष्कर्ष निघाला आहे.

ज्याअर्थी, श्री. बी.आर.टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी त्यांचा निलंबन कालावधी व सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करण्याचा विनंती अर्ज शासनास सादर केला आहे.

ज्याअर्थी, श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांचे निलंबन संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक २८/०३/२०१४ च्या आदेशान्वये रद्द करून त्यांना शासन सेवेत पुनर्स्थापित करण्यात आले होते. तथापि, तद्नंतर त्यांना शासनाच्या दिनांक २०/०५/२०१४ च्या आदेशान्वये पदस्थापना देण्यात आली आहे. त्यामुळे, श्री. टोणपे हे दिनांक २९/०३/२०१४ ते पदस्थापना दिल्यानंतर प्रत्यक्ष रूजू होईपर्यंत म्हणजेच दिनांक २१/०५/२०१४ पर्यंत पदस्थापनेविना राहिले आहेत.

त्याअर्थी, आता वरील पार्श्वभूमीवर श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचा निलंबन कालावधी नियमित करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ७२ (ए) व (बी) मधील तरतूदींचा वापर करून व सक्तीच्या

प्रतीक्षाधीन कालावधी आणि पदग्रहण अवधीबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्थी) (सुधारणा) नियम, २००९ मधील नियम क्रमांक २ (ए) नोंद क्रमांक १ मधील तरतुदींचा वापर करून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

(१) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ७२ (ए) व (बी) मधील तरतूदींचा वापर करून श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचा दिनांक ०२/०७/२०१३ ते दिनांक २८/०३/२०१४ हा निलंबन कालावधी "निलंबन कालावधी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तथापि, हा निलंबन कालावधी सेवानिवृत्तीविषयक लाभांसाठी ग्राह्य धरण्यात येत आहे.

(२) श्री.भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचे निलंबन मागे घेण्यात आल्यानंतर त्यांना शासन सेवेत पदस्थापना मिळण्यासाठी लागलेला संपूर्ण कालावधी (पदग्रहण अवधीचा कालावधी धरून) म्हणजेच दिनांक २९/०३/२०१४ ते दिनांक २१/०५/२०१४ हा नियुक्तीविना राहिलेला संपूर्ण कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्थी) (सुधारणा) नियम, २००९ मधील नियम क्र. २ (ए) नोंद क्रमांक १ मधील तरतूदींनुसार "सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी" म्हणून नियमित करण्यात येत आहे. या कालावधीत श्री.टोणपे हे कर्तव्यावर हजर असते तर जितके वेतन व भत्ते मिळण्यास ते हक्कदार झाले असते, तितके पूर्ण वेतन व भत्ते श्री. टोणपे यांना अदा करण्यात यावेत. तसेच हा कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून गृहीत धरण्यात येत आहे.

श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक हे सध्या जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सातारा येथे कार्यरत आहेत. त्यामुळे श्री. टोणपे, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना देय ठरत असलेल्या रक्कमेची परिगणना करून अदा करण्याची कार्यवाही वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सातारा येथून करावी. सदर आदेश महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील नियम ७२ (३) च्या तरतूदीनुसार व महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्थी) (सुधारणा) नियम, २००९ मधील नियम क्रमांक २ (ए) नोंद क्रमाक १ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७२०१७३७५१६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.07.20 17:50:38 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री. भालचंद्र रामचंद्र टोणपे, जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सातारा. (संचालनालयामार्फत)

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), (महाराष्ट्र-१) मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
५. गोपनीय लिपीक (पापु-१५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, गो.ते.रूग्णालय इमारत, सातवा मजला, क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
६. निवडनस्ती (पापु-१५)